**तक्रार निवारण समितीच्या बैठका जिल्हा पातळीवर घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक क्र. जिपसं-२०१०/प्रक्र-१७२/ आस्था.-७,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,**
**दिनांक १४ डिसेंबर, २०१०.**

**वाचा :** **१)** ग्राम विकास विभाग,शासन निर्णय क्र.एमआयएस-१५८२/सीआर-७७१/९-ब,दिनांक २१ फेब्रुवारी १९८३.
**२)** ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक क्र. जिपसं-२००१/प्रक्र-२७५/१६, दि. २० ऑक्टोबर, २००१.

**परिपत्रक**

शासन निर्णय क्र.एमआयएस-१५८२/सीआर-७७१/९-ब, दिनांक २१ फेब्रुवारी १९८३ अन्वये जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या स्थानिक स्वरुपाच्या तक्रारींचे निवारण करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखाली प्रत्येक जिल्हयात तक्रार निवारण समितीची स्थापना करण्यात आलेली आहे. या समितीच्या सभा प्रत्येक कॅलेंडर वर्षात दोन वेळा घेण्यात याव्यात, असे आदेश सदर शासन निर्णयान्वये देण्यात आलेले आहेत. तसेच, क्र. जिपसं-२००१/प्रक्र-२७५/१६, दि. २० ऑक्टोबर, २००१ शासन परिपत्रकान्वये या सूचनांचा पुनरुच्चार करण्यात आलेला आहे.

२. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, तक्रार निवारण समितीच्या सभा नियमित घेतल्या जात नाहीत, त्यामुळे जिल्हा परिषद सेवेतील कर्मचाऱ्यांचे प्रश्न स्थानिक पातळीवर सुटत नाहीत आणि जिल्हा परिषद कर्मचारी संघटना आपल्या मागण्यांसाठी व आपले स्थानिक प्रश्न सोडविण्यासाठी देखील शासनाकडे सतत पत्रव्यवहार करीत असतात. महाराष्ट्र जिल्हा परिषद सेवा (सेवाप्रवेश) नियम, १९६७ नुसार वर्ग-३, वर्ग-४ च्या जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांबाबत सक्षम प्राधिकारी मुख्य कार्यकारी अधिकारी आहेत. तसेच महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा नियम, १९६८ मधील नियम १० नुसार वर्ग-३ व वर्ग-४ च्या जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांचे शासनास असलेले सेवाविषयक बाबींचे अधिकार विभागीय आयुक्तांना प्रदान केले आहेत.

३. महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ नुसार जिल्हा परिषदेच्या वर्ग-३ व वर्ग-४ च्या कर्मचाऱ्यांसदर्भात नियुक्ती प्राधिकारी म्हणून सक्षम असलेल्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांचे प्रश्न जिल्हा परिषद पातळीवर तत्परतेने निकाली काढण्याच्या दृष्टीने व गतिमान प्रशासन देण्याच्या संकल्पनेच्या ध्येयपूर्तीसाठी आणि कर्मचाऱ्यांचे प्रश्न त्वरित सुटून त्यांना

अधिक चांगल्या कामाची जाण होण्याच्या दृष्टीने जिल्हा परिषद पातळीवर प्रश्न जिल्हा परिषद संघटनांच्या तक्रारी सोडविण्यासाठी प्रत्येक कॅलेंडर वर्षात नियमित दोन बैठका घेऊन त्यांच्या प्रश्नाचे निराकरण करावे. तसेच, विभागीय आयुक्त यांनी त्यांचे स्तरावर होणाऱ्या नियतकालीक बैठकांमध्ये मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांना अशाही सूचना द्याव्यात की, कर्मचाऱ्यांची वैयक्तिक गाऱ्हाणी आणि स्थानिक स्वरुपाचे प्रश्न सोडविण्यासाठी शासनाकडे पत्रव्यवहार करण्याचे टाळावे.

४. सन २०१० मध्ये वर्षभराच्या काळात अशा बैठका न घेतलेल्या जिल्हा परिषदांनी मार्च २०११ पुर्वी बैठक घेऊन विभागीय आयुक्त यांना अहवाल पाठवावा

५. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आले असून त्याचा **<u>संगणक सांकेतांक क्र.</u>** 201012141924001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स्वाक्षरी) १४/१२/२०१०

**( सु. नि. गाडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
विभागीय आयुक्त, (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
सह सचिव (जिल्हा परिषद, आस्थापना), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
उप सचिव / सह सचिव ( सर्व ),ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
अवर सचिव /कक्ष अधिकारी, ( सर्व ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
नवड नस्ती ( कार्यासन आस्था-७ ), ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई -३२